# बी. बी. सी., लुई मॅले व स्वातंत्र्य

## अनिल सहस्रबुद्धे ह्यांचा आक्षेप

श्री. पळशीकर यांचा नोव्हेंबर-डिसेंबर मधील लुई मॅले यांच्याविषयीचा लेख वाचला. जाने-फेब्रुवारीच्या अंकात प्रा. दाभोलकर व श्री. पळशीकर यांची पत्रापत्री वाचावयास मिळाली. माझ्या मते पळशीकरांना लुई मॅले यांची कला फारच आवडलेली दिसते. कला याच दृष्टिकोनातून पाहावयाचे झाले तर भारतीय चित्रपट लेखकांनीसुद्धा यापेक्षा चांगले लघुपट तयार केले आहेत. मागच्या वर्षी तबल्याच्या पार्श्वसंगीतावर एका संस्थने भारतीय जीवनाचे चित्रण केले आहे. त्यामध्येसुद्धा भारतातील काही वाईट प्रकारांवर कॅमेरा फिरवला आहे. त्यात भारताची प्रतिमा कोठे डागाळली आहे असे वाटले नाही. ते चित्रण कलेच्या दृष्टीने तर सुंदरच वाटले. त्यात समतोलता आढळली. तशी समतोलता जर मॅलेंनी दाखवली असती, तर प्रा. दाभोलकरांना लुई मॅले यांचा चित्रपट आवडलाही असता परंतु भारताच्या दोषावरच कोणत्याही प्रकारे बोट ठवण्याचे प्रकार त्यांना अगर इतर कोणासही आवडणार नाहीत.

प्रा. दाभोलकरांनी पाहिलेल्या भागास पळशीकर ‘भारताचा एक पैलू’ असे म्हणतात यावरही आश्चर्यच वाटले. कारण या प्रकारचे पैलू फक्त भारताच्याच वाटेला आले आहेत काय? पुढारलेल्या देशांत, उदा. इंग्लंड-अमेरिकेत व विशेषतः फ्रान्समध्ये, असे व्यवसाय आहेतच ना? परंतु त्यांचे जे आहे ते त्यांच्या संस्कृतीला धरूनच आहे, तो त्यांचा पैलू नाही, असे पळशीकरांना सुचवायचे आहे का?

मॅले यांनी एक कला म्हणून जर चित्रपटमालिका तयार केली असेल तर पार्लमेंटसारख्या राजकीय व्यासपीठावर आपली कला पारखण्याची त्यांना जरूर वाटली नसती. त्यातही, पार्लमेंटच्या सदस्यांशी म्हणजे 'कलेच्या क्षेत्रात असलेल्यां’शी चर्चा करणे हा पळशीकरांचा दावा एक आश्चर्याचाच प्रकार वाटतो. पार्लमेंट हे कलेची जाण असलेल्या लोकांचे व्यासपीठच आहे असे पळशीकर यांना म्हणावयाचे आहे काय? लुई मॅले यांनी पार्लमेंटमधील प्रमुख पुढाऱ्यांच्या मुलाखती घेतल्या असत्या तर त्यात थोडे तथ्य वाटले असते.

भारताने जगाचे नेतृत्व करण्याचे स्वप्न पहाणाऱ्यांपैकी पळशीकर एक आहेत. यात आनंदच आहे. परंतु अडचण अशी आहे की, स्वप्न हे स्वप्नच राहाण्याची भीती आहे. आपणास अजून आपल्या देशाचे नेतृत्व नीटपणे करता येत नाही मग जगाचे नेतृत्व करण्याची स्वप्ने कशाला पाहावीत, व अशी शक्यता दिसत नसताना या प्रकारच्या स्वप्नांना ‘टोमणा’ म्हटल्यास चूक आहे असे मला तरी वाटत नाही. याबाबत एक उदाहरण देणे सयुक्तिक ठरेल. ब्रिटनचे माजी पंतप्रधान मि. हॅरॉल्ड विल्सन यांनी दोन-तीन वर्षांपूर्वी कॉमन्समध्ये असे सांगितल्याचे आठवते की, "ब्रिटन ही आज जगातील मोठी शक्ती राहिलेली नसून फक्त एक पुढारलेले राष्ट्र आहे. त्याप्रमाणे भारताबद्दलच्या आपल्या कल्पना - स्वप्न वगैरे फारच गैर वाटल्या तर तो ‘टोमणा’च आहे असे जर कोणाला वाटले तर ते बरोबरच आहे.

'बी. सी. सी., लुई मॅले व स्वातंत्र्य' या लेखात पळशीकरांनी स्वातंत्र्याचा अर्थ फार मोठ्या व्याप्तीने घेतला असावा.

लिखाण आणि इतर या प्रकारच्या स्वातंत्र्याचा अर्थ थोडा मर्यादितच असावा. भारताबद्दलच्या कोणत्याही अपप्रचारास स्वातंत्र्याच्या बुरख्याखाली कोणतीही हरकत घेता कामा नये असा अर्थ नसावा. पळशीकरांनी आपल्या उत्तरात, “मॅले यांची भारताविषयीची जाण उथळ, खोटी असण्याची खूपच शक्यता आहे," अशी कबुली दिली आहे. मग अशी उथळ व खोटी जाण असण्याची शक्यता असताना स्वातंत्र्याचा प्रश्न येतोच कुठं? खरे, खोटे काही असले तरी ते स्वातंत्र्याच्या नावाखाली खपते का? लुई मॅले यांची या प्रकारची चित्रपटमालिका जर बी.बी.सी. भारताचा विरोध असतानाही दाखवत असेल आणि मग बी.बी.सी.वर भारताने बंदी केली तर स्वातंत्र्याचा उद्घोष करणाऱ्यांनासुद्धा ही भूमिका पटण्यासारखी आहे.

**वसंत पळशीकर ह्यांचे उत्तर**

माझ्या लेखाचा विषय कलावंताच्या कलाकृतीविषयी आपण कोणती भूमिका बाळगावी हा होता हे श्री. सहस्रबुद्धे यांच्या नजरेतून सुटले आहे.

भारताविषयी अपप्रचार परदेशी सरकारतर्फे, किंवा सरकारी आश्रयावर चालणाऱ्या स्वायत्त संघटनांमार्फत जाणूनबुजून केला जात आहे असे आपणास वाटते तेव्हा आपण निषेध करावा. हा निषेध ते सरकार जुमानत नाही असे आपणास वाटत असेल तेव्हा त्याविरुद्ध स्वाभिमानपूर्वक कृतीही करावी. यात स्वातंत्र्याचा प्रश्न येतच नाही. पण अपप्रचार कशास म्हणावयाचे, जाणूनबुजून अपप्रचार करण्यासाठीच अमूक एक गोष्ट केली जात आहे असे कधी म्हणता येईल या गोष्टींची स्पष्टता करणे आवश्यक पण कर्मकठीण आहे.

उदाहरणार्थ, पूर्व पाकिस्तानमधील विद्रोहाबद्दल सहानुभूतीपूर्ण बातम्या येणे ही गोष्टदेखील पाकिस्तान सरकारला अपप्रचारात्मक वाटली व म्हणून त्या सरकारने सर्व वार्ताहरांना हाकलले. सहस्रबुद्धे यांच्या भूमिकेनुसार ही कृती योग्यच म्हणावयास हवी. मला तर ती योग्य वाटत नाहीच, पण सहस्रबुद्धे यांना तरी ती योग्य वाटते का? वार्ताहरांना जे दिसते ते त्यांनी सांगावे याचे स्वातंत्र्य त्यांना असले पाहिजे. आपण काय पाहावे तेही त्यांनी ठरवावयाचे आहे. या स्वातंत्र्याचा गैरवापर ते करणारच नाहीत असे नाही. पण अशा गैरवापरावर त्यांना हाकलून देणे ही योग्य कृती नसून आपल्या दृष्टीने योग्य समज निर्माण करणारी प्रति-कृती करणे हा त्यावरील उपाय आहे.

हीच गोष्ट कलावंताची. आणि म्हणून भारतात आल्यावर त्यांनी अमूक एक भाग वगळून बाकीचेच जीवन पाहिले पाहिजे असे म्हणणे गैर होईल. एखाद्या कलावंताने वेश्यावस्तीतील काही दृश्ये चित्रित केली तर 'तुझ्या देशातल्या वेश्यांचे जीवन चित्रित कर, आमच्या देशातल्या वेश्या पाहाण्याचे तुला काय कारण (त्या फक्त आम्हीच पाहू)' असे म्हणणे वेडगळपणाचे आहे. तो फक्त वेश्यांचेच जीवन किंवा तत्सम इतर भाग चित्रित करीत राहिला तर (१) या विषयांखेरीज इतर काही सुचत नाही त्याअर्थी कोणत्यातरी मनोविकृतीचा तो बळी आहे, किंवा (२) समाजजीवनाचे हे अंग हा त्याचा खास अभ्यासाचा व कार्याचा विषय आहे असे आपण म्हणू शकतो. तो विकृत मनाचा असेल तर त्याच्या चित्रणाने प्रेक्षक फार काळ प्रभावित होणे अशक्य आहे. दुसरे कारण असेल तर, अशा माणसाने केलेले चित्रण हे

आपल्यालाही काही नवीन जाण देऊन जाईल. तात्पर्य, कलावंताला स्वातंत्र्य देण्याने आपले नुकसान होण्याचा धोका नाही. उलट, एकाच प्रकारचे चित्रण करण्याची सक्ती केल्यास ती धोकादायक ठरेल. स्वातंत्र्याच्य बाबतीत, ते विविध भूमिकांतून पाहण्याचे, विचार करण्याचे स्वातंत्र्य असेल तर, स्वाभाविक समतोल निर्माण झाल्याखेरीज राहात नाही.

एक गोष्ट इथे आवर्जून सांगितली पाहिजे. मॅले यांची संपूर्ण मालिका आपल्यापैकी फार कोणी पाहिलेलीच नाही. ती न पाहताच, त्यांनी फक्त भारतीय समाजजीवनाचे 'गलिच्छ' - 'गलिच्छ' असे आरोपण वादग्रस्त आहे ही गोष्ट तूर्त बाजूला ठेवून - अंगच पाह्यले - दाखवले आहे अशी पक्की समज करून घेणे अन्याय्य आहे. ज्या गोष्टींनी त्यांची नजर वेधून घेतली त्या गोष्टी त्यात आल्या असण्याची शक्यता जास्त; आणि, माणसाला अपरिचित गोष्टी चटकन् आकृष्ट करतात, तेव्हा मॅलेंना 'नवीन' वा 'विक्षिप्त' वा 'गूढ' वाटलेल्या गोष्टींचे चित्रण त्यांच्या मालिकेत अधिककरून असावे असा एक तर्क करता येतो, इतकेच. त्यामुळे मॅले यांची चित्रपटमालिका हा चर्चेचा विषय होऊ शकत नाही, त्या निमित्ताने पुढे आलेला कलावंताच्या स्वातंत्र्याचा मुद्दाच फक्त येथे प्रस्तुत आहे.

माझ्या लेखात जे मी म्हटलेलेच नव्हते त्या गोष्टींचे आरोपण करून काही मुद्दे सहस्रबुद्धे यांनी उपस्थित केले आहेत. मॅले यांची चित्रपटमालिका मी पाहिलेलीच नाही तर ती मला आवडणे - नावडणे कसे शक्य आहे? दाभोलकरांनी जो भाग पाहिला (व ज्यात "भारतीय जीवनाचा एक पैलू" दिसतो असे मी म्हटले) त्यात चित्रित केलेले जीवन पुढारलेल्या देशांत नसते असे मी कोठे म्हटले? “पार्लमेंटच्या सभासदांशी चित्रपटमालिका दाखवून चर्चा करण्यास" मॅले तयार होते, कारण बदनामीचा आरोप व त्याविरुद्धची कृती राजकारणी जगातून आलेली होती. कला म्हणून त्याची 'पारख' करण्याची त्यांची कल्पना नव्हती. जिला एक सामाजिक अंग आहे अशी एखाद्या कलावंताची प्रस्तुत चित्रपटमालिकेसारखी कृती बेताल वा विकृत वाटते तेव्हा ती लोकांसमोर यावी की नाही याची चर्चा करावयाची झाल्यास ती करण्याची पद्धत कोणती असावी, ती चर्चा कोणी करावी याविषयी मी काही लिहिले होते. पार्लमेंटच्या सभासदांशी चर्चा करण्याची मॅलेंची तयारी व माझी कल्पना यांचे संदर्भ वेगळे आहेत व त्यांची गल्लत सहस्रबुद्धे यांनी करावयास नको होती.

निर्बंधांच्या कडेकोट तटबंदी उभारून आपली लाज राखण्याच्या प्रयत्नांवर भर देण्यापेक्षा सर्व भारतीयांसाठी अबूदार जीवन निर्माण करण्यात आपली शक्ती आपण लावावी, याची फार गरज आहे.